कोठडीतील मृत्यूची दंडाधिकारीय
चौकशी विहित कालमर्यादेत पूर्ण करणे.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग.

परिपत्रक क्रमांक एमआयएस ०१८७/पेक्र.८१/पोल-१४,
गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ७ डिसेंबर,२००१.

वाचा:- क्रिमिनल मिसीलीनीयस पीटीशन क्र.४२०१/१९९७, ४१०५/१९९,२६००/२६०१/२००० आणि ४८०/२००० सह रिट पिटीशन (क्रिमिनल) क्रमांक ५३९/८६ आणि ५९२/८७ डि.के.बसू व इतर विरुध्द पश्चिम बंगाल शासन व इतर यामध्ये सर्वोच्च न्यायालयाने दिनांक १२ ऑक्टोबर २००१ रोजी दिलेले आदेश.

शासन परिपत्रक:-

डि.के.बसू व इतर विरुध्द पश्चिम बंगाल शासन व इतर यामध्ये दाखल झालेल्या वरील नमूद याचिकेमध्ये दिनांक १९ ऑक्टोबर २००१ रोजी सर्वोच्च न्यायालयाने असे निर्देश दिले आहेत की,फौजदारी प्रक्रिया संहिता कलम १७६ नुसार दंडाधिका-यामार्फत करण्यांत येत असलेली कोठडीतील मृत्यूची चौकशी जास्तीत जास्त चार महिन्याचे कालावधीत पूर्ण करावी. तथापि, या कालावधीत ही चौकशी पूर्ण झाली नाही तर त्याबाबतची कारणे संबंधित अधिका-याने नमुद करुन संबंधित जिल्हा न्यायाधिशाकडून चौकशीची मुदत वाढवून घ्यावी. सत्र न्यायाधिशांनी ही मुदतवाढ देताना कलम १७६ नुसार होणारी ही चौकशी सत्वर पूर्ण होईल हे पहावे कि जेणे करुन डि.के.बसू व इतर विरुध्द पश्चिम बंगाल व इतर यामध्ये सर्वोच्च न्यायालयाने याबाबतीत दिलेले निर्देश निष्फळ ठरणार नाहीत. सर्वोच्च न्यायालयाचे हे निर्देश लक्षात घेवून सर्व संबंधितांनी कार्यवाही करावी अशा सुचना देण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

[ रमेश शिंदे ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व परिक्षेत्रीय पोलीस महानिरीक्षक,
पोलीस महानिरीक्षक (मानवी हक्क) महाराष्ट्र राज्य,मुंबई,
सर्व जिल्हादंडाधिकारी,
सर्व पोलीस अधिक्षक,
सर्व उपविभागीय दंडाधिकारी,
प्रबंधक,सर्व सत्र न्यायालय.